शासकीय वाहन चालकांना देण्यात येणा-या अतिकालिक भत्त्याबाबत खुलासा.

महाराष्ट्र शासन,
वित्त विभाग,
शासन परिपत्रक क्र.अकाभ-1395/17/सेवा-9,
मंत्रालय, मुंबई 400 032, दिनांक 26 जुलै, 1995.

## प रि प त्र क

सध्या शासन निर्णय, वित्त विभाग क्र.अकाभ-1393/प्र.क्र.109/सेवा-9, दिनांक 29 मार्च, 1995 नुसार शासकीय वाहनचालकांना अतिकालिक भत्ता मंजूर करण्यात येतो. संबंधित आदेशाची अंमलबजावणी करण्याच्या दृष्टीने खाली नमूद केलेले मुद्दे उपस्थित करण्यात आले होते. उपस्थित मुद्यांबाबत खालीलप्रमाणे खुलासा करण्यात येत आहे.

| मुद्दे | खुलासा |
|---|---|
| 1) वाहन चालकांच्या कामाची नियमित वेळ व दौ-यावर असताना विहित कार्यालयीन वेळ कोणती धरण्यात यावी. | अतिकालिक भत्त्याची परिगणना करण्यासाठी वाहन चालक कामावर हजर झाल्याच्या वेळेपासुन नऊ तासापर्यंतचा कालावधी कार्यालयीन वेळ म्हणून विचारात घेण्यात यावा. |
| 2) मुख्यालयात असताना विहित कार्यालयीन वेळेपूर्वी वाहनचालकाने काम केले असल्यास, त्याला अतिकालिक भत्ता देय आहे किंवा कसे? | अतिकालिक भत्त्यासाठी वाहन चालकाला कामावर बोलाविण्यात आल्यानंतर तो हजर झाल्याच्या वेळेपासून 9 तास इतका कालावधी कामाची वेळ म्हणून मानावयाचा असल्याने विहित कार्यालयीन वेळेपूर्वीचा कालावधी अतिकालिक भत्त्यासाठी विचारात घेण्याचा प्रश्न उद्‌भवत नाही. |
| 3) मुख्यालयात असताना रविवार किंवा सुट्टीच्या दिवशी अतिकालिक भत्ता कशा प्रकारे मंजूर करण्यात यावा. | रविवार किंवा सुट्टीच्या दिवशी वाहन चालकाला कामावर बोलाविण्यात आल्यास कामाच्या कालावधीकरिता प्रति तास याप्रमाणे अतिकालिक भत्ता मंजूर करण्यात यावा. तथापि सदरहू दिवसाची पूरक रजा मंजूर करण्यात येऊ नये. |
| 4) दौ-यावर असताना वाहन चालकाची कामाची वेळ कशी ठरविण्यात यावी व त्याला अतिकालिक भत्ता कशा प्रकारे मंजूर करण्यात यावा. | अ) दौ-यावर असतानाही मुद्दा क्र.1 मध्ये खुलासा केल्याप्रमाणे कर्तव्यकाळाच्या पहिल्या नऊ तासानंतरच्या कालावधीत त्याने जेवढे तास प्रत्यक्ष गाडी चालविण्याचे ( Steering duty ) काम केले असेल तेवढ्याच कालावधीसाठी विहित दराने अतिकालिक भत्ता मंजूर करण्यात यावा.<br>ब) जर वाहन चालकास विहित कामाच्या कालावधीत दौ-यावर जावे लागले तर कर्तव्याचा नऊ तासाचा कालावधी पूर्ण करण्यासाठी दौ-यावरील कालावधी विचारात घेऊन उर्वरित कालावधीमध्ये जेवढा वेळ प्रत्यक्ष गाडी चालविण्याचे काम केले असेल तेवढ्याच कालावधीसाठी विहित दराने अतिकालिक भत्ता देण्यात यावा.<br>क) नऊ तासाचा विहित कर्तव्य कालावधी संपल्यानंतर दौ-यावर जावे लागले तर जेवढा वेळ प्रत्यक्ष वाहन चालविण्याचे काम केले असेल तेवढ्याच कालावधीकरिता विहित दराने अतिकालिक भत्ता देण्यात यावा. |

उ) मुख्यालयाबाहेरील एक / किंवा अनेक ठिकाणी दौ–यावर असतानाही प्रतिदिन नऊ तासाच्या विहित कर्तव्य कालावधी–नंतरच्या उर्वरित कालावधीत प्रत्यक्ष गाडी चालविण्याचे काम केले असेल तेवढ्याच कालावधीकरिता विहित दराने अतिकालिक भत्ता देण्यात यावा.

ऊ) दौ–यावर असताना ज्यावेळी दैनिक भत्ता अनुज्ञेय असेल अशा वेळी अनुज्ञेय असलेल्या अतिकालिक भत्त्याची गणना करण्यासाठी नऊ तासांच्या विहित कर्तव्य कालावधीनंतर प्रत्यक्ष गाडी चालविण्याचे काम केले असेल त्या कालावधीकरिता अतिकालिक भत्ता देण्यात यावा. तथापि दौ–याच्या कालावधीत दैनिक भत्ता अनुज्ञेय नसेल अशा वेळी मात्र मुख्यालयाच्या ठिकाणी देण्यात येणा–या अतिकालिक भत्त्याप्रमाणे नऊ तासाच्या विहित कर्तव्य कालावधीनंतर प्रति तास, याप्रमाणे अतिकालिक भत्त्याची गणना करण्यात यावी.

ई) दौ–यावर असताना रविवार किंवा सुट्टीच्या दिवशीसुध्दा उपरोक्त "ड" येथील मुद्यासमोरील खुलाशाप्रमाणे अतिकालिक भत्ता मंजूर करण्यात यावा.

| | |
|---|---|
| 5) अतिकालिक भत्त्याचे आदेश रुपांतरित/रोजंदारी/कार्यव्ययी आस्थापनेवरील वाहन चालकांना लागू आहेत किंवा कसे. | अतिकालिक भत्त्यासंबंधीचे आदेश रुपांतरित आस्थापनेवरील वाहन चालकांना लागू आहेत. रोजंदारी व कार्यव्ययी आस्थापनेवरील कर्मचा–यांना लागू नाहीत. |

हे आदेश दिनांक 1.12.1994 पासून अंमलात येतील. तथापि जी प्रकरणे दिनांक 1.12.1994 पूर्वी अंतिमतः निकालात काढण्यात आलेली आहेत ती पुन्हा उघडण्यात येऊ नयेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

शरद बसनाक,
शासनाचे अवर सचिव.

प्रति,

महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)–1, महाराष्ट्र, मुंबई (80 प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)–1, महाराष्ट्र, मुंबई (80 प्रती),
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)–2, महाराष्ट्र, नागपूर (40 प्रती),
महालेखापाल (लेखापरीक्षा)–2, महाराष्ट्र, नागपूर (40 प्रती),
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (40 प्रती),
निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई (5 प्रती),
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री यांचे खाजगी सचिव,
सर्व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक,
* प्रबंधक, मूळ न्याय शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
* सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
मंत्रालयातील सर्व विभाग,
मंत्रालयाच्या निरनिराळ्या विभागांच्या अधीन असलेल्या सर्व विभागांचे व कार्यालयांचे प्रमुख,
वित्त विभागातील सर्व कार्यासने (ग्रंथपाल 5 प्रती)
निवड नस्ती, कार्यासन सेवा–9.
* पत्राने.